**मनोधैर्य योजनेअंतर्गत सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व संनियंत्रणासाठी “आभासी वैयक्तिक ठेव लेखा (Virtual Personal Deposit Account) ही व्यवस्था व कार्यपद्धती लागू करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग,**

**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/५४/प्र.क्र.५३/का-२२,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २०.०३.२०२४.

**पहा :-**

१) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.मबावि २०२०/प्र.क्र.१६५/कार्या २, दिनांक ०१.०१.२०२४.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. संकीर्ण २०२३/प्र.क्र.११०/२०२३/कोषा प्रशा-५, दिनांक १४.०२.२०२४.

३) सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे अध्यक्षतेखाली दि.२३.०१.२०२३ रोजी आयोजित बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

बलात्कार (Rape)/ बालकांवरील लैंगिक अत्याचार (Sexual Assault), ॲसिड हल्ला (Acid Attack) व ज्वालाग्राही/ ज्वलन शील पदार्थांमुळे (पेट्रोल, डिझेल, रॉकेल, स्वयंपाकाचा गॅस, इत्यादी ज्वलनशील पदार्थ) बळी पडलेल्या महिला आणि बालकांना अर्थसहाय्य व पुनर्वसन करण्यासाठी राज्यात “नवीन सुधारित मनोधैर्य योजना” राबविण्यात येत असून त्याबाबत दि.०१.०१.२०२४ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील परि.५ अन्वये, “नवीन सुधारित मनोधैर्य योजने” अंतर्गत पीडितांच्या अर्थसहाय्याच्या मागणीचे अर्ज स्वीकारण्याचे, पीडितांच्या अर्थसहाय्याच्या दाव्यांवर निर्णय घेऊन पीडितांस देय असणाऱ्या रक्कमांचे वाटप करण्याचे पूर्ण अधिकार महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण, मुंबई यांना प्रदान करण्यात आले आहेत. दि.०१.०१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील परि.६ अन्वये, पीडितांस अर्थसहाय्य देण्याच्या प्रयोजनासाठी महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण, मुंबई यांच्यामार्फत सुरु करण्यात आलेली "Manodhairya Assistance Account" (MAA) खाती बंद करुन त्या ऐवजी स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA account) सुरु करण्यात यावे, पीडितांस अर्थसहाय्य देण्यासाठी राज्य शासनामार्फत दरवर्षी निधी उपलब्ध करून देण्यात येणार आहे, अशी तरतूद करण्यात आली आहे.

२. या प्रयोजनासाठी महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण, मुंबई यांच्यामार्फत उघडण्यात आलेल्या PLA A/c या स्वतंत्र बँक खात्यामध्ये खाजगी कंपन्यांकडून/संस्थांकडून CSR व इतर

माध्यमातून देणगीच्या स्वरूपात प्राप्त होणाऱ्या निधीचाही समावेश असेल.

३. सुधारित नवीन मनोधैर्य योजनेबाबतच्या दिनांक ०१.०१.२०२४ च्या शासन निर्णयातील परि.१० अन्वये आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या योजनेसाठी "नियंत्रक अधिकारी" आणि सर्व जिल्हा महिला व बालविकास अधिकारी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात आले आहे. या योजनेच्या अंमलबजावणीकरिता सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली दि.२३.०१.२०२३ रोजी आयोजित बैठकीमध्ये, जिल्हा विधि सेवा प्राधिकरण यांच्या स्तरावर PLA account सुरू करण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत. या योजनेअंतर्गतचा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाज कल्याण, १०३ महिला कल्याण, (२४) (०१) पीडीत महिला आणि बालक "मनोधैर्य योजना" (२२३५ बी-१८३)-३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येणार आहे.

४. राज्याच्या एकत्रित निधीतून २७ लहान बांधकामे, ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर), ३३-अर्थसहाय्य, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान, ५०-इतर खर्च, ५३-मोठी बांधकामे, आणि वित्त विभागाद्वारे वेळोवेळी घोषित करण्यात येतील अशा अन्य उद्देश शीर्ष अंतर्गत (Object Head) आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाचे जलद संवितरण व संनियंत्रण करण्यासाठी शासनाने दिनांक १४.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये "आभासी वैयक्तिक ठेव लेखा (Virtual Personal Deposit Account) ही व्यवस्था व कार्यपद्धती लागू केली आहे. या व्यवस्थेमध्ये उपरोल्लेखित विवक्षित उद्दिष्ट शीर्षाखालील अर्थसंकल्पीय तरतूदीच्या मर्यादेत सहायक अनुदान संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडून प्रचलित कार्यपध्दतीनुसार यथास्थिती अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई / जिल्हा कोषागार कार्यालय / उप कोषागार कार्यालय येथून महाराष्ट्र कोषागार नियम, नमुना क्रमांक ४४ देयकांद्वारे पुस्तकी समायोजनाद्वारे संबंधित "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" यांच्या "आभासी वैयक्तिक ठेव लेख्यात" जमा केले जाईल. त्यानंतर सदर निधीतून संबंधित योजना किंवा कार्यक्रम यासाठीच्या विहित कार्यपद्धतीचा काटेकोर अवलंब करून संबंधित आदात्यांना अनुज्ञेयतेप्रमाणे करावयाचे प्रदान या आभासी वैयक्तिक ठेव लेख्यांच्या प्रशासकांकडून आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रणालीशी संलग्न असलेल्या प्रचलित अधिकृत ई-प्रदान प्रणालीच्या माध्यमातून केले जाईल.

५. मनोधैर्य योजनेवरील खर्च ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली करण्यात येत आहे. ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाअंतर्गत सहायक अनुदानाचे जलद संवितरण व संनियंत्रण करण्यासाठी शासनाने दिनांक १४.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये "आभासी वैयक्तिक ठेव लेखा (Virtual Personal Deposit Account) ही व्यवस्था व कार्यपद्धती लागू केली असल्याने, मनोधैर्य योजनेअंतर्गत सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व संनियंत्रणासाठी "आभासी वैयक्तिक ठेव लेखा (Virtual Personal Deposit Account) ही व्यवस्था व कार्यपद्धती लागू करण्याच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

## शासन निर्णय :-

मनोधैर्य योजनेअंतर्गत पीडितांस अर्थसहाय्य देण्याच्या प्रयोजनासाठी जिल्हा विधी सेवा प्राधिकरण, मुंबई यांच्यामार्फत सुरु करण्यात आलेली "Manodhairya Assistance Account" (MAA) खाती बंद करून, मनोधैर्य योजनेअंतर्गत सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व संनियंत्रणासाठी "आभासी वैयक्तिक ठेव लेखा" (Virtual Personal Deposit Account) ही व्यवस्था व कार्यपद्धती लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. "आभासी वैयक्तिक ठेव लेखा" (Virtual Personal Deposit Account) ही प्रणाली कार्यान्वित करण्यासाठी प्रथम संबंधित क्षेत्रीय आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" "Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)" म्हणून घोषित करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने, या शासन निर्णयासोबतच्या "परिशिष्ट" मध्ये नमूद सर्व कार्यालयांतील आहरण व संवितरण अधिकारी यांना या शासन निर्णयाव्दारे "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना यथास्थिती अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई किंवा संबंधित जिल्हा कोषागार कार्यालय येथे "आभासी वैयक्तिक ठेव लेखा" (VPDA) उघडण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर आहरण व संवितरण अधिकारी हे यथास्थिती महालेखापाल, (ले. व अ.)-१/२, मुंबई/नागपूर कार्यालयाकडून "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" म्हणून प्रत्यक्ष कामकाज करण्यासाठीचे प्राधिकारपत्र मिळविण्यासाठी यथास्थिती महालेखापाल, (ले. व अ.)-१/२, मुंबई/नागपूर कार्यालयास तातडीने प्रस्ताव सादर करतील आणि महालेखापाल, (ले. व अ.) कार्यालयाबरोबर योग्य समन्वय ठेवून असे प्राधिकारपत्र सत्वर प्राप्त करुन घेतील. यथास्थिती महालेखापाल, (ले. व अ.)-१/२, मुंबई/नागपूर यांचेकडून प्राधिकारपत्र निर्गमित झाल्यानंतर संचालनालय, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून "आभासी ठेव लेखा प्रशासक संकेतांक" देण्यात येईल. सदर कार्यवाही प्राधान्याने पूर्ण करवून घेण्यासाठी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी व्यक्तिशः जबाबदार असतील.

३. आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रणाली कार्यान्वित करणे आणि या प्रणालीअंतर्गत निधीचे हस्तांतरण, निधीचे संवितरण, रोख पुस्तक, ताळमेळाचे कामकाज, लेखांकन, रकमांचा विनियोग करण्यासाठी कालमर्यादा, उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करणे, अखर्चित रकमांचा शासन खाती भरणा, लेखापरीक्षा, इत्यादीबाबत उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील दिनांक १४.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील दिनांक १४.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.११.१ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार, तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ ३८८/व्यय-५, दिनांक १८.०३.२०२४ व अनौपचारिक संदर्भ ७०/२०२४/कोषा प्रशा-५, दिनांक १९.०३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३२०१३१५१०६८१२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GIRISH RAMLING SAGANE

Digitally signed by GIRISH RAMLING SAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8a9b5d43113d71f5bfc96922b7f43ac6c2848591ed3e1f34019d8b33a3cdb267, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=17189CF8C13CB2294570F54627B6E879FDC09820CCBF3380ED23DA0258EA27C8, cn=GIRISH RAMLING SAGANE
Date: 2024.03.20 13:24:32 +05'30'

**( गि. रा. सगणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) अ.मु.स./प्र.स./सचिव, सर्व विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई.
६) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९)प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य विधि सेवा प्राधिकरण, १०५, सा.बां.इमारत, उच्च न्यायालय, मुंबई.
१४) सचिव, उच्च न्यायालय विधि सेवा समिती, मुंबई व उपसमिती नागपूर / औरंगाबाद खंडपीठ.
१५) सचिव, सर्व जिल्हा विधि सेवा प्राधिकरणे.
१६) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
१७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२१) कार्यासन अधिकारी, (व्यय-५/कोषा प्रशा-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२२) विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३) निवड नस्ती (कार्यासन-२२).

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/५४/प्र.क्र.५३/का-२२, दिनांक २०.०३.२०२४ सोबतचे**

**परिशिष्ट**

मनोधैर्य योजनेअंतर्गत "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" "Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)" म्हणून घोषित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची(DDO) यांची यादी.

| Sr. No. | Desigantion of DDO | DDO code | Working place/District |
|---|---|---|---|
| 1 | Secretary, District Legal Service Authority, Thane | 1201004634 | Thane & Palghar |
| 2 | Secretary, District Legal Service Authority, Raigad | 1301004634 | Raigad |
| 3 | Secretary, District Legal Service Authority, Ratnagiri | 1401004634 | Ratnagiri |
| 4 | Secretary, District Legal Service Authority, Sindhudurg | 1501004634 | Sindhudurg |
| 5 | Secretary, District Legal Service Authority, Pune | 2201004634 | Pune |
| 6 | Secretary, District Legal Service Authority, Satara | 2301004634 | Satara |
| 7 | Secretary, District Legal Service Authority, Sangli | 2401004634 | Sangli |
| 8 | Secretary, District Legal Service Authority, Solapur | 2501004634 | Solapur |
| 9 | Secretary, District Legal Service Authority, Kolhapur | 2601004634 | Kolhapur |
| 10 | Secretary, District Legal Service Authority, Aurangabad | 3101004627 | Aurangabad |
| 11 | Secretary, District Legal Service Authority, Parbhani | 3201004634 | Parbhani & Hingoli |
| 12 | Secretary, District Legal Service Authority, Beed | 3301004634 | Beed |
| 13 | Secretary, District Legal Service Authority, Nanded | 3401004626 | Nanded |
| 14 | Secretary, District Legal Service Authority, Osmanabad | 3501004634 | Osmanabad |
| 15 | Secretary, District Legal Service Authority, Jalna | 3601004626 | Jalna |

| | | | |
|---|---|---|---|
| 16 | Secretary, District Legal Service Authority, Latur | 3701004634 | Latur |
| 17 | Secretary, District Legal Service Authority, Gondia | 4401005627 | Gondia |
| 18 | Secretary, District Legal Service Authority, Wardha | 4501004634 | Wardha |
| 19 | Secretary, District Legal Service Authority, Nagpur | 4601004635 | Nagpur |
| 20 | Secretary, District Legal Service Authority, Bhandara | 4701004626 | Bhandara |
| 21 | Secretary, District Legal Service Authority, Chandrapur | 4801004634 | Chandrapur |
| 22 | Secretary, District Legal Service Authority, Gadchiroli | 4901004626 | Gadchiroli |
| 23 | Secretary, District Legal Service Authority, Nashik | 5101004626 | Nashik |
| 24 | Secretary, District Legal Service Authority, Dhule | 5201004626 | Dhule |
| 25 | Secretary, District Legal Service Authority, Jalgaon | 5301004634 | Jalgaon |
| 26 | Secretary, District Legal Service Authority, Ahmednagar | 5401004626 | Ahmednagar |
| 27 | Secretary, District Legal Service Authority, Nandurbar | 5501004634 | Nandurbar |
| 28 | Secretary, District Legal Service Authority, Amravati | 6101004634 | Amravati |
| 29 | Secretary, District Legal Service Authority, Akola | 6201004634 | Akola |
| 30 | Secretary, District Legal Service Authority, Buldhana | 6301004626 | Buldhana |
| 31 | Secretary, District Legal Service Authority, Yavatmal | 6401004634 | Yavatmal |
| 32 | Secretary, District Legal Service Authority, Mumbai Suburban | 7101004634 | Mumbai Suburban |
| 33 | Secretary, District Legal Service Authority, Mumbai District | 7101014634 | Mumbai District |
| 34 | Secretary, District Legal Service Authority, Washim | 6501004634 | Washim |

************